कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या बदल्या व नियुक्त्या.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११७/(१९२/२०१७)/आ.(वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**तारीख: १८ मे, २०१७.**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने नियुक्त्या / पदस्थापनेत बदल खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव (सर्वश्री.) | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | र.ग.वाडकर | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, ओरोस, सिंधुदूर्ग. | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |
| २. | वि.ब.थोरात | कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) विभाग, अहमदनगर. | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |
| ३. | मनिष नागनाथ राजभोज | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद, पालघर. | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |
| ४. | कुमार हंबीरराव पाटील | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, लातूर. | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |
| ५. | प्र.पां.कडुस्कर | कार्यकारी अभियंता, टेंभू उपसा सिंचन प्रकल्प विभाग क्र. १, सांगली. | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या बदलीने रिक्त राहणाऱ्या पदांवर अन्य अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. संबंधित वरिष्ठ अधिका-यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिका-यास आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे.

तसेच, संबंधीत अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०५१८१७२४३१२३२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d3662 33b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2017.05.18 17:43:42 +05'30'

**(अतुल कोदे)**
शासनाचे सह सचिव

प्रत,

१. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण विकास महामंडळ, औरंगाबाद.
५. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
६. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
९. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१०. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
११. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
१२. संबंधीत अधिकारी.
१३. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४. सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.